**गट-अ व ब मधील सरळसेवा/पदोन्नती कोटयातील रिक्त पदे विहित कार्यपध्दतीने भरण्याची कार्यवाही <u>तातडीने करण्याबाबत.</u>**

महाराष्ट्र शासन
सामान्य प्रशासन विभाग,
क्रमांक : एसआरव्ही-२०१०/प्र.क्र.२८/१२,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांक :- ४.२.२०१०

वाचा : १) शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग, क्र.एसआरव्ही-२००६/प्र.क्र.१७१/०६/१२, दि. १७.२.२००७.
२) शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग, क्र.एसआरव्ही-२००६/प्र.क्र.९४/०६/१२, दि.१३.७.२००७.
३) शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग, क्र.एसआरव्ही-२००७/प्र.क्र.१२९/०७/१२, दि.२७.८.२००७.
४) शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग, क्र.एसआरव्ही-२००७/प्र.क्र. १५९/०७/१२, दि.१.१०.२००७.
५) शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग, क्र.एसआरव्ही-२००७/प्र.क्र.१९९/०७/१२, दि.१७.११.२००७.
६) शासन परिपत्रक, सामान्य प्रशासन विभाग, क्र.एसआरव्ही-२००९/प्र.क्र.२५१/०९/१२, दि.१८.१२.२००९.

## <u>शासन परिपत्रक</u>

शासन सेवेतील सर्व संवर्गातील रिक्त पदे विहित कार्यपध्दतीने व तातडीने भरण्याचे निदेश सामान्य प्रशासन विभागाने संदर्भाधीन शासन निर्णय व परिपत्रकान्वये वेळोवेळी सर्व प्रशासकीय विभाग/विभागप्रमुख/कार्यालय प्रमुख यांना दिले आहेत. तसेच गडचिरोली जिल्हयातील रिक्त पदे सर्वोच्च प्राधान्य देऊन तातडीने भरण्याबाबत व गोंदिया जिल्हयातील रिक्त पदे तातडीने भरण्याबाबत दि.१८.१२.२००९ च्या परिपत्रकान्वये निदेश दिले आहेत. या अनुषंगाने मंत्रिमंडळाने दिलेल्या निदेशानुसार सर्व प्रशासकीय विभागांच्या अधिपत्याखालील गट-अ व ब मधील जिल्हानिहाय व महसूली विभागनिहाय रिक्त पदांची माहिती मंत्रिमंडळाच्या दि.३.२.२०१० च्या बैठकीत सादर करण्यात आली. या माहितीवरुन रिक्त पदे भरण्याची कार्यवाही आवश्यक गतीने करण्यात येत नसल्याचे दिसून आले. या अनुषंगाने मा.मुख्य सचिव यांनी दिलेल्या निदेशानुसार रिक्त पदे लवकरात लवकर भरण्याच्या दृष्टीने पुढीलप्रमाणे निदेश देण्यात येत आहेत :-

(१) सरळसेवेच्या कोटयातील रिक्त पदे लवकरात लवकर भरण्यासाठी आयोगाच्या कक्षेतील पदांच्या बाबतीत आयोगाकडे मागणीपत्र कोणत्याही परिस्थितीत **<u>दि.२८.२.२०१० पर्यंत</u>** पाठविण्यात यावे. तसेच ज्या पदांसाठी यापूर्वीच मागणीपत्र पाठविण्यात आले आहे व त्याबाबत आयोगाने काही माहिती / खुलासा मागविला आहे त्यासंदर्भात आवश्यक माहिती / खुलासा आयोगास तात्काळ उपलब्ध करण्यात यावा व मागणीपत्राच्या अनुषंगाने पाठपुरावा प्रशासकीय विभागांनी करावा.

(२) पदोन्नती कोटयातील ज्या पदांच्या बाबतीत सामान्य प्रशासन विभाग (कार्यासन-१२/१६-ब) च्या मान्यतेने निवडसूची अंतिम करण्यात येते अशा पदांच्या बाबतीत निवडसूची तयार करण्यासाठी विभागीय पदोन्नती समितीची बैठक झाली असल्यास निवडसूचीचा उचित प्रस्ताव तात्काळ सामान्य प्रशासन विभागाकडे पाठविण्यात यावा. तसेच अशा पदांच्या बाबतीत विभागीय पदोन्नती समितीची बैठक अद्याप झाली नसल्यास बैठक घेऊन निवडसूचीचा उचित प्रस्ताव तात्काळ सामान्य प्रशासन विभागाकडे पाठविण्यात यावा. याबाबतची कार्यवाही प्रशासकीय विभागांनी कोणत्याही परिस्थितीत **दि.३१.३.२०१० पर्यंत** पूर्ण करावी.

२. वरील आदेशांचे काटेकोरपणे पालन करुन विहित कार्यपद्धतीने रिक्त पदे लवकरात लवकर भरण्याच्या अनुषंगाने सर्व प्रशासकीय विभागांनी तातडीने कार्यवाही करावी. पदोन्नतीच्या कोटयातील रिक्त असलेली पदे भरण्यासंदर्भात प्रशासकीय विभागांनी दि.३१.३.२०१० पर्यंत आवश्यक कार्यवाही न केल्यास सदर बाब मा.मुख्य सचिव यांच्या निदर्शनास आणण्यात येईल याची सर्व विभागांनी नोंद घ्यावी.

३. सदर शासन परिपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या वेबसाईटवर उपलब्ध करण्यात आले असून त्याचा संगणक संकेतांक २०१००२०४१५१०१८००१ असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावांने,

**के.पी.बक्षी**
**प्रधान सचिव, महाराष्ट्र शासन.**

**प्रति :-**

सर्व मंत्रालयीन विभागांचे अपर मुख्य सचिव / प्रधान सचिव / सचिव,
सर्व मंत्रालयीन विभाग (आस्थापना)
यांनी हे आदेश विभागातील सर्व संबंधीत कार्यासनांच्या निदर्शनास आणावेत.

प्रत माहितीसाठी,
मा.मुख्य सचिवांचे वरिष्ठ स्वीय सहायक.